**लघु पाटबंधारे साठवण तलाव शेगांव क्र.२ ता. जत, जि. सांगली या योजनेस रु. ४२८.२१ लक्ष किंमतीच्या प्रथम सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्र. लपायो/सुप्रमा/१०११/प्र.क्र.४७४/२०११/लपा-१

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०४ फेब्रुवारी, २०२२

**पहावे :-**

१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम. निर्णय क्र.(२००)/ (२३१/२०००) प्रमा/लपा.२/३१३/२०००/ दिनांक- ९.५.२०००

२) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम. क्र./२११/११९६/२०११/लपा-२/ दि.२१/११/२०११

३) वित्त विभागाचे पत्रक्र. व्यअस-२०२१/प्र.क्र.१७५ /अर्थ-२ दि.०६/०१/२०२२

**प्रस्तावना:-**

शेगांव क्र.२ लघु पाटबंधारे साठवण तलाव हा सांगली जिल्ह्याच्या जत तालुक्यातील शेगांव गावाच्या पूर्वेस स्थानिक नाल्यावर बांधण्यात आला आहे. सदर प्रकल्प महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत पुणे या प्रदेशांतर्गत आहे. १.१६२ दलघमी एकूण पाणीसाठ्याच्या या प्रकल्पाद्वारे जत तालुक्याती शेगांव गावाकरीता धरणाच्या खालील बाजूस व वरील बाजूस धरणातील पाणी उपसा करून सिंचन करणे नियोजित आहे. त्यासाठी लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात आली आहे.यामुळे जत तालुक्यातील **अवर्षण प्रवण** क्षेत्रातील २६१ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळेल.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.१ येथील महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. म.कृ.को.वि.म. निर्णय क्र.(२००)/ (२३१/२०००) प्रमा/लपा.२/३१३/२०००/ दि.९.५.२००० च्या महामंडळाच्या निर्णया अन्वये प्रादेशिक दरसूची सन १९९९-२००० नुसार रु. २,१७,३७,८२६/- लक्ष रकमेस मूळ प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यो अनुषंगाने सदंर्भ क्र.२ अन्वये महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या कडुन शेंगाव क्र.२ लघु पाटबंधारे साठवण तलाव ता.जत , जि.सांगली या प्रकल्पाच्या सन २००७-०८ च्या दरसुचीवर आधारीत रू ४२८.२१ लक्ष किंमतीच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव , शासनास प्राप्त झाला आहे.

हा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि. १६ डिसेंबर २०२१ च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने सद्य:स्थिती, दरसूचीतल बदल, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादि किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन शेगांव क्र.२ लघु पाटबंधारे साठवण तलाव योजना,

ता. जत, जि. सांगली या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २००७-०८ वर आधारित रु.४२८.२१ लक्ष किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

शेगांव क्र.२ लघु पाटंबधारे साठवण तलाव योजना, ता. जत, जि. सांगली या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २००७-०८ वर आधारित रु. ४२८.२१ ( अक्षरी रु. चार कोटी अठावीस लक्ष एकवीस हजार ) किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी रु.४०१.०३ लक्ष व अनुषंगीक खर्च २७.१८ लक्ष) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता . प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) लघु पाटंबधारे साठवण तलाव योजना शेगांव क्र.२, ता. जत, जि. सांगली या प्रकल्पाची प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय अनिश्मितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्याचवेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीयमर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणेयाची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय कार्यालयांची राहील.

४) राज्य तांत्रीक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची स्वर्स्वी जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५) प्रस्तुत योजनेच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा आदेश निर्गमित झाल्यानंतर तीन महिन्यात प्रकल्पाचा पूर्णत्व अहवाल देण्यात यावा.

६) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

७) संपूर्ण प्रकल्प हा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (एक), म.कृ.खो.वि.म. अंतर्गत योजना" या शिर्षकाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.१९४/२०१७ दिनांक १६/०८/२०१७ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.२७८/व्यय-१२/२०२१, दिनांक २४/०८/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक १६/१२/२०२१ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितिच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २२२ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२०४११५६०२६३२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अमोल फुंदे
(अमोल फुंदे)
शासनाचे उपसचिव

सहपत्र :- परिशिष्ट "अ"

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, याचे सचिव मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
९. जिल्हाधिकारी, सांगली
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
११. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१२. मुख्य अभियंता,(जसं) जलसंपदा विभाग, पुणे
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१५. अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
१६. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१७. कार्यासन/ कार्यासन लपा, (संग्रहार्थ) ....

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो /सुप्रमा/१०११/४७४/२०११ दिनांक: ०४ फेब्रुवारी,२०२२ चे परिशिष्ट)

**लघु पाटंबधारे साठवण तलाव शेगांव क्र.२ योजना, ता.जत, जि. सांगली प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूद**

| अ.क्र. | उपशिर्ष | प्रथम सुप्रमानुसार तरतुद (दरसूची सन २००७-०८) रू. लक्ष |
|---|---|---|
| **अ) शिर्ष कामे** | | |
| १. | अे - प्राथमिक | १.८६ |
| २. | बी - भूसंपादन | १२९.१९ |
| ३. | सी -मुख्य कामे | २१२.९३ |
| ४. | डी - विमोचक | ५६.१९ |
| ५. | जी.पूल | ०.०० |
| ६. | के-इमारती | ०.०० |
| ७. | एम-वृक्षारोपण | ०.०३ |
| ८. | ओ-संकीर्ण | ०.२९ |
| ९. | पी-देखभाल दुरुस्ती | ०.५४ |
| १०. | आर-रस्ते | ०.०० |
| ११. | एक्स- पर्यावरण | ०.०० |
| | **एकूण शिर्षकामे (अ)** | **४०१.०३** |
| **ब) अनुषंगीक खर्च** | | **२७.१८** |
| **एकूण (अ+ब)** | | **४२८.२१** |

### ठळक वैशिष्ट्ये

| | | |
|---|---|---|
| १. | शेगांव क्र.२ योजनेचे सिंचन क्षेत्र :- | २६१ हेक्टर |
| २. | योजनेचा पाणीसाठा :- | १.१६२ द.ल.घ.मी. |
| ३. | लाभव्यय गुणोत्तर :- | १.६४ (मापदंड १ पेक्षा अधिक मापदंडात बसते) |
| ४. | आर्थिक परतावा दर :- | १२.६५% ( मापदंड १० % पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसत आहे. |
| ५. | पाणीसाठा किंमत :- | रू. ३६८३४/- प्रति संघमी प्रचलित मापदंड रू २९०२३/-स.घ.मी. |

(अमोल फुंदे)
शासनाचे उपसचिव